## ➦ संपर्क


**ई साहित्य प्रतिष्ठान**
जी ११०२, ईटर्निटी
मॅरेथान चौक
ठाणे - ४००६००४.

☎ ९८६९६७४८२०

➦ *हा अंक विनामुल्य मिळवण्यासाठी तसेच सुचना, अभिप्राय व प्रतिक्रियांसाठी*

✉ **netaksharee@gmail.com**

## संपादकीय

" सावल्यांच्या पावलांशी वेडया स्मृतींचा येरझारा
याचवाटे जन्म गेला, त्याचाच आहे शोध सारा.."

वारा सुचवतो मनाला सैरभैर संध्याकाळ.. मग आभाळाच्या कागदावर पाखरांची चार अक्षरं तोच लिहुन देतो..त्यांच्या पंखाचे अर्थ.. कोरा रंग एका भगव्या क्षणाला बदलतात....नंतरचं. त्या अक्षरांच काहीसं पुसट होणं...दिसेनासं होणं.... त्याचवेळी एकाच थेंबाचं तेजोमय अर्घ्य कुणी देत जाणं..अगदी सगळं ठरल्यागत, ठरवल्यागत... उगाच वाटतं... जणु पाण्याची हाक असावी..

त्या आतुरल्या ओलाव्याचा सावळा किरणओघळ पडताना विलग होणारा आत्माच त्या हाकेला साद देण्यासाठी दिशांना पांगल्यासारखा....त्याच्या पावलांखाली स्मरणांच्या खुणा सहज लिहिण्यासारख्या उमटतात.... अन पुढच्या अंधारवाटांवर हरवतात...काही त्यांच्यात सामील होतात..... अशीच संध्याकाळ मन घेउन शोधत असावं स्मरणांच्या प्रदेशातील ज्ञात-अज्ञात हाकांच्या दिशा सावल्यांसोबत..... कधी त्यांच्या मागे...तर कधी त्यांच्याही पुढे...

नेटाक्षरीची ही **"सावल्यांची पावले"**....त्यांच्या खुणा....

आठवांना अर्पण....

- सचिन काकडे (मुंबई)

## सावल्या

थकतात पाय जेंव्हा आधार सावल्यांचे
कळतात का कुणाला? व्यवहार सावल्यांचे

गर्दीत हाल होती लाचार सावल्यांचे
तुडवून लोक जाती उपकार सावल्यांचे

फ़ुकटात भेटलेले शेजार सावल्यांचे
भरवू नका उद्याला बाजार सावल्यांचे

✍ खेळाडू

## तुझे उपकार भारी

तुझ्या सावली खाली
लागं उन्हाची झळाळी
तरी व्हट माझे बंद
तुझे उपकार भारी..!!

जीव कसनुसा होत
ओझं मनात जपत
तुझ्या आसवाची धार
माझ्या ओंजळीत आली

माझ्या मनाचं संगीत
तुझं नादावलं गीत
त्याच्या आखरिची ओळ
माझ्या व्हटावर आली

तुझ्या सावली खाली
लागं उन्हाची झळाळी..!!

✍ खेळाडू

## बाहुल्या

तुझेच पडदे ,मंच तुझा अन तुझ्याच सावल्या होत्या
कळ सुत्रीच्या ताली नाचत तुझ्याच बाहुल्या होत्या

तुझा सूर्य अन तुझा चांदवा, तुझाच अंधार ही होता
तुझ्या प्रकाशा मध्ये सावल्या ,तुझ्या उजळल्या होत्या

तुझी निर्मिती, तूच सजवले , तुच नटवले होते
तुझ्या भूमिका तुझ्याचसाठी, तूच वठवल्या होत्या

तूच मौन अन तुझेच शब्द , पडदा तूच उचलला होता
तुझ्या पदार्पणाला टाळ्या , तुझ्याच पडल्या होत्या

तुझेच येणे तुझे पहाणे , तुझेच जिंकणे होते
कित्येक चाली तुझ्या मनाच्या , कितीदा फसल्या होत्या

तूच मांडला तूच मोडला , पुन्हा थाटला होता
अविरत चाले खेळ तुझा ,पण बाहुल्या बदलल्या होत्या
कळ सुत्रीच्या ताली नाचत तुझ्याच बाहुल्या होत्या

✍ अभिषेक मु.प्रभुदेसाई - इचलकरंजी

# सावल्या

गाल रूळत्या बटा घेउन
तु घाईत धुतल्या पायांनी यायचीस
" चल,कालच्या डावापासुन पुढे..."

मग चिप्पी चिप्पी खेळतांना..
गरम फरशीवर तिचा पाउलशिक्का
उमटायचा
विझायचा...उमटायचा
विझायचा..2-1-2-1

वाफ विझती पावले,
लंगडी-चौकोन घरं मोडायची तरी
माझं लक्ष विझत्या शिक्क्यावर....

ती म्हणायची ," बावळटचेस..!पाचव्या घराला पाय बदलला ना रे
मी..."
"चुका करतांना पुरावे मागे ठेवतेस" म्हणायचा मी
"नाही नाही ते आधीचं आहे..." म्हणत पाय थयाथया आपटत ,
तु पैंजणातुंन ओल्या चांदण्या शिंपायची...
ओल्या चांदण्या......!

अंगणात खाट टाकुन एवढ्यासाठी नाही झोपत मी रात्री आताशा...

तुझ्या परतपावलांच्या सावल्या दिसतात ...सावल्या..!
आभाळ शिंपलेल्या चांदण्यांमध्ये...

✍ प्राजक्त देशमुख - नाशिक

सावल्यांची पावले

## खेळ

तळ्यात का मळ्यात
ऊन का सावली
खेळ खेळण्यात दंग
चिखलात रुतला पाय
ऊन्हात हरवली सावली
शोध शोध शोधली
सापडली लहान बाहुलीची
मोठी सावली
चिखलात रुतलेली

पायाला चिखल
कपड्याला चिखल
आजु बाजु रपरप
चिखल चिखलात
कोणी येईना सावलीला
कोणी सोडवी ना बाहुलीला

रड रड रडली
विहिरित जाऊन पडली
चिखल सारा गेला सरून
बाहुली विहिरित निपचित पडुन

रजनी अरणकल्ले -पुणे

# तुझी सावली टाळते मीच आता

शहाण्यापरी वागते मीच आता....
तुझी सावली टाळते मीच आता

टिपुर चांदणे हे तुझ्या आठवांचे...
उरा जाळते, वाळते मीच आता

पुन्हा स्वप्न अर्ध्यावरी मोडण्याच्या..
भयाने सख्या जागते मीच आता

पहाटे उशीला भिजवतात अश्रू...
तया माळुनी, गाळते मीच आता

उन्हे उंब-याशी किती शोध घेती...
तुझे गाव त्या दावते मीच आता

झळा सोसवेनात या वेदनेच्या....
निखा-यांवरी चालते मीच आता

जिवापाड आईस संभाळताना...
तिची 'माय' ही लागते मीच आता

सुप्रिया जाधव -पुणे.

# सावल्यांच्या पाऊलखुणा..

तुझ्या आधी अन तुझ्या नंतर
सावल्याच फक्त अन हे अंतर
काळोखाचा लळा लागला..
जपता आठवं अशी निरंतर
आठवांच्या मातीमधली वाट एकली कधीच नव्हती
जपता जपता निखळणारी माळ गुंफली कधीच नव्हती
धागा निसटला नकळत तेव्हा.. आता कसले जपतो जर तर?
तुझ्या आधी अन तुझ्या नंतर
सावल्याच फक्त अन हे अंतर

तुझ्यासवे हा चांदणसडा
पूनवेनही भरला चुडा
चांदवाही चमके भाळी
सूर्व्यालाही तेज झळाळी
तुझ्याविना धगधगतं नभ
तुझ्याविना कसलं जग?
तिरप्या उन्हात वाढत्या सावल्या
भरल्या डोळ्यात वाहत्या बाहुल्या
सूर्व्या, चांदवा नभही जर्जर..
तुझ्या आधी अन तुझ्यानंतर
सावल्याच फक्त अन हे अंतर

हिरमुसली जरी.. ती वाट अजूनी खुणावते
जाता जाता आठवांनाही क्षणात तिथे बोलावते
काळजाच्या ठोक्यांनाही साद तुझी सतावते
एकल्याच त्या वाटेवरती सांग कसे हे जगायचे

डोळे झगडतात आसवांशी
आसवंही पापण्यांशी
ओघळता ते गालांवरती वाट अडखळे पावलांशी
एकला मी कधीच नसतो साथ मिळते सावल्यांची
हसतो रडतो बोलतो भांडतो
फक्त आता या सावल्यांशी

दिस विझतो रातही सरते
वाटेलाही आस असते फक्त तुझ्या पावलांची
बोलत राहतो असाच मग मी आठवांशी तुझ्या पुन्हा
कितीक जपाव्या काळजानं त्या..
सांग सावल्यांच्या पाऊलखुणा... सावल्यांच्या पाऊलखुणा..

✍ कुणाल प्रकाश रुद्राके -पुणे

## रस्ते ...

तुझ्या सावल्यांनी पुन्हा रोखले रस्ते
जिथे थांबलो मी तिथे लांबले रस्ते !

कुठे जात आहे कुठे जायचे होते
मला धावणारे इथे भेटले रस्ते !

तरी सोबतीने बरी चालली झाडे
उगा सावल्यांच्या घरी धावले रस्ते.

तिच्या पायवाटा कशा ओळखू सांगा ?
इथे पापण्यांनी बघा साचले रस्ते.

धरावा कितीदा तिने हात सोडावा
किती साद घालू , कुठे थांबले रस्ते ?

घड्या काळजाच्या सखे अंथराव्या मी
तरी पावलांना तुझ्या टोचले रस्ते.

तशा वादळांना दिशा कोणत्या होत्या ?
कशाला नकाशे कुणी आखले रस्ते ?

दिली वाट ज्यांना पुढे जायचे होते
अशांनीच माझे पुढे कापले रस्ते !

✍ सुधीर मुळीक - मुंबई.

सावल्यांची पावले

# Premacha Chaos

ती निघून जाते आणि
मी बघत रहातो सावल्या.....

सावल्या...... तीच्या ... माझ्या....... आमच्या

तिची सावली,
सतत पाठलाग करणारी,
आणि माझी.... ?
माझी सावली,
वेगवेगळी रुपं घेवून तिला फसवणारी.....

तिचा समुद्र,
माझ्या डोळ्यातून सुरू होतो....
तिचा वारा,
माझ्या श्वासात जन्म घेतो,
तिचा सूर्य,
म्हणजे माझ्याच काळजातला दाह की....
तिचा चंद्र ,
माझ्या अर्धवट मिटल्या डोळ्यांची प्रतिकृती

तिचं आकाश,
माझ्या कवितांनी विणलेलं,
तिचा तळं,
माझ्या इच्छांची वलयं पेलत भरलेलं..
तिचा नकाशा,
माझ्या हस्तरेषांत गुंफलेला
तिचा पारिजातक,
माझ्या मनातल्या शब्दांची फुलं पांघरलेला....

माझं नाटक तसं
सुंदर वठतय खरं!
एक एक रुप,
एक एक प्रवेश,
तिच्या आयुष्यात नवरसांचे
नवनवे रंग भरतोय,

पण.....
.
.
प्रश्न पडतोय,
माझ्या तिच्यासाठी व्याकूळ झालेल्या
ह्रिदयाला...

°ती° केवळ एक "प्रेक्षक"
की....
...
"परिक्षक" ???

(ती निघून जाते आणि
मी बघत रहातो सावल्या)
आणि अचानक भानावर येवून लागतो
पुन्हा....
पडद्यामागची रंगीत तालीम करायला.........

✍ शंतनु चंद्रात्रे - नाशिक



# सावल्या

शब्दात माझ्या मांडू कशा
या आयुष्यातील सावल्या
अमावस झाल्या कधी
कधी उन्हातून पावल्या

खेळल्या मनसोक्त येथे
वाटल्या ओळखीच्या सावल्या
कधी पळती पुढे पुढे
कधी पाठीमागे राहल्या

प्रकाश येता कुठे गेल्या
घाबरल्या का सावल्या ?
प्रकाशाच्या पुढे जो
त्याच्यामागे सावल्या

वर्ण नाही , जात नाही
ना भाषा पाहून वागल्या
भेद नाही करत पहा
काळ्या काळ्या सावल्या

सुर्य जाता खाली खाली
पहा कशा रूंदावल्या
जणू काजळरातीतून
विरघळल्या सावल्या

खेळ येथे किरणांचा
वेडावल्या सावल्या
तिरक्या-फ़िरक्या कशाही
उंडारल्या सावल्या

शर्यतीत जगण्याच्या
जीव लावून धावल्या
माझे तुझे करताना
खंतावल्या सावल्या

मी कुठे आहे एकटा
या दूरदेशी अंधारल्या
माझ्यासवे सोबतीला
चालतात सावल्या

नाही कुठलेच दू:ख नाही
सा-या सुखामध्ये सामावल्या
त्या अर्धवट कथा आणि
त्यांच्या वर्तमानी सावल्या

फ़ुले टवटवीत कागदाची
त्यांच्या कोमेजल्या सावल्या
लपवून दू:खे हसतो कलंदर
त्याच्या बावरल्या सावल्या



खेळाडू

## उन्हाळी मन ..

सायंकाळी माझ्या मनातल्या सावल्या
जेंव्हा तळ्याकाठी बसतात,
अंगभर पाय सोडून...
तेंव्हा माझा अस्तित्व सुर्य
पश्चिमेला बुडू लागतो...
पाण्याच्या तवंगाचे
मनाच्या तरंगाशी
प्रस्थापित नाते !
अस्तित्वाच्या खुणा
पाण्याइतक्याच विरळ...

सावल्या जोर करतात
सावल्या फेर धरतात..

सावल्यांचे अधिराज्य
मनाच्या राजपाटावर ...
'मी' कोण ?
अस्तित्व नाकारणारे जीवन..
की
सावल्यांच्या आधाराने
त्यांच्याच आडोशाने
जगणारे..

एक उन्हाळी मन...!!!!

✍ अरुण नंदन- नाशिक



सोडून सावलीला पळणार मी कितीसा ?
केले तुला वजा तर उरणार मी कितीसा..!..

अभिजीत दाते - मुंबई

# बारा लाख वाचकांसाठी ई चळवळ

तीन वर्षापूर्वी स्थापन झालेल्या ई साहित्य प्रतिष्ठानने आजवर आपल्या वाचकांना दिडशेहन अधिक पुस्तके विनामुल्य दिली. मोरया , मीरा, कृष्ण, गुरूदेव रविंद्रनाथ, स्वामी विवेकानंद, विंदा करंदीकर, ना. धो. महानोर, ग्रेस, नारायण सुर्वे, लोकमान्य टिळक, छत्रपती शिवाजी महाराज असे एकाहून एक सरस विषय आम्ही घेतले. सुमारे ४०० नविन साहित्यिकांना लोकांसमोर आणले. इंटरनेट्वर मराठी भाषेतील साहित्य लोकप्रिय करण्याची चळवळ हिरीरीने पुढे नेली.

प्रेम आणि सौंदर्याबरोबरच आत्महत्या आणि दहशतवाद अशा विषयांवरच साहित्य मांडल. विनोदाला वाहिलेलं ई-श्टाप देऊन हसवलं. लहान मुलांसाठी बालनेटाक्षरीची निर्मिती केली. शास्त्रीय संगीतासाठी संगीत कानसेनचे वर्ग चालवले.

नव्या कवींसाठी एक भक्कम व्यासपीठ म्हणजे नेटाक्षरी चालवले. तर महाराष्ट्रातील किल्ल्यांची माहिती देणा-या पुस्तिका "दुर्ग दुर्गट भारी" द्वारे महाराष्ट्रातल्याच नव्हे तर जगातल्या मराठी मंडळींना उभारी दिली. लाखभर रसिकांपर्यंत दर्जेदार साहित्य नियमितपणे विनामुल्य पोचवण्याची आमची परंपराआम्ही अधिक जोमाने चालू ठेवूच. आम्हाला हा उत्साह आणि प्रेरणा देणारी आपली पत्रेही येत राहूदे. पण मनात एक विचार येतो. आपली वाचकसंख्या फक्त लाखभर लोकांपर्यंतच मर्यादित का? १२ कोटी मराठी माणसांपैकी निदान १२ लाख वाचकांपर्यंत तरी हे विनामूल्य साहित्य पोचलचं पाहिजे असं नाही वाटत आपल्याला ? आणि त्यासाठी काही फार करायची गरज नाही. आपल्या ओळखीच्या १२ लोकांची, १२ मराठी लोकांची ईमेल आयडी द्याल?? जास्त दिलीत तरी हरकत नाही पण निदान १२ लोकांची ईमेल आयडी पाठवा. एक लाख लोकांनी जर प्रत्येकी १२ आयडी पाठवले तर लाखाचे १२ लाख व्हायला कितीसा वेळ लागणार ? बारा लोकांची मेल आयडी पाठवणा-या वाचकांना आम्ही ई साहित्य प्रतिष्ठानचे पाठीराखे म्हणून मानाचे स्थान देऊ. तुम्हाला आमच्या पुढील प्रवासाची कल्पना देत राहू. तुमच्या सुचना मागवत राहू. मार्गदर्शन घेत राहू. आमच्या पुढील प्रवासाचे तुम्ही सहप्रवासी असाल.

तर होणार ना ई-साहित्य प्रतिष्ठानचे पाठीराखे ??

फक्त आपल्या खास मराठी मित्र, नातेवाईकांच्या १२ मेल आयडी खालील पत्त्यावर पाठवा.

esahity@gmail.com

खात्री बाळगा या मेल आयडीचा कोणत्याही प्रकारे गैरवापर केला जाणार नाही. जाहिराती अथवा भलभलत्या मेल पाठवून त्रास देणार नाही. याचा उपयोग केवळ चांगले मराठी साहित्य पाठवण्यासाठी केला जाईल.

:अधिक माहितीसाठी :

संकेत स्थळ

www.esahity.com

फेसबुक

https://www.facebook.com/esahity

नेटाक्षरीच्या या अंकासाठी प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणे मदत केलेल्या दोस्तीचे सर्व कवी लेखकांचे आभार !!


धन्यवाद !!